मानीव दिनांक देण्याबाबत.

**श्री. जयंत गणेश डोंगरे, सेवानिवृत्त लेखा परिक्षक, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय, सातारा.**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**

**शासन आदेश क्रमांक: व्यशिअ २०२४/प्र.क्र. ४३/व्यशि-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
२ रा मजला, मंत्रालय (मुख्य इमारत), मुंबई -४०००३२
दिनांक : २९ एप्रिल, २०२४.

**वाचा:-** (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२००२/प्र.क्र. ०२/२००२/१२, दि. ०६/०६/२००२

(२) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.व्यशिप्र-२०२३/आस्था-२/प्र.क्र. ५/ मानीव दिनांक/का-४, दि. ०५/१०/२०२३

**शासन आदेश :-**

श्री. जयंत गणेश डोंगरे, सेवानिवृत्त लेखा परिक्षक, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय, सातारा यांना टिप्पणी सहायक/ वरिष्ठ लिपीक पदाकरीता श्रीम. कारखानीस व श्री. ढमढेरे यांच्या वरीष्ठ लिपीक पदावरील पदोन्नतीचा दि. ३१/१०/१९८५ हा मानीव दिनांक मंजूर करण्याची व त्या अनुषंगाने प्रमुख लिपीक पदाकरीता श्री. पाटील यांच्या पदोन्नतीचा दि. १४/०५/२००५ हा मानीव दिनांक देण्याची विनंती व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने संदर्भ क्र. (२) येथील पत्रान्वये शासनास केली आहे.

२. श्री. जयंत गणेश डोंगरे यांची औद्योगिक प्रशिक्षण संस्था, सातारा येथे व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे यांच्या दि. ०१/०७/१९७८ रोजीच्या आदेशान्वये कनिष्ठ लिपिक पदावर प्रथम नेमणुक करण्यात आली होती. त्या अनुषंगाने श्री. डोंगरे हे कनिष्ठ लिपिक पदावर दि. ६/७/१९७८ रोजी रुजू झाले. श्री. डोंगरे हे त्यांच्या मूळ नेमणुकीच्या वेळी कनिष्ठ लिपिक पदासाठी आवश्यक असणारी अर्हता धारण करित असल्याने, त्यांची व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, पुणे यांच्या दि.२९/१०/१९८४ रोजीच्या आदेशान्वये कनिष्ठ लिपिक पदावरील सेवा मुळ नेमणूकीच्या दिनांकापासून (दिनांक ६/७/१९७८) नियमित करण्यात आली असून, कनिष्ठ लिपिक संवर्गात दिनांक ६/७/१९७८ पासून सेवाजेष्ठता दर्शविण्यात आली होती.

३. व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय पुणे विभागामध्ये श्री. ढमढेरे यांची दिनांक ११/१/१९८२ रोजी अनुकंपा तत्वावर कनिष्ठ लिपिक पदावर नेमणुक करण्यात आली होती. त्या अनुषंगाने त्यांची सेवाप्रवेशोत्तर परीक्षेसाठी दिनांक १/८/१९८२ ते दि. १५/१०/१९८२ या कालावधीत अयोजित करण्यात आलेल्या प्रशिक्षणासाठी निवड करण्यात आली. सदर प्रशिक्षणाच्या अनुषंगाने जुलै,१९८३ मध्ये झालेल्या परिक्षेत श्री. ढमढेरे प्रथम संधीत उत्तीर्ण झाले. तथापि, श्री. डोंगरे यांच्या सेवा नियमित नसल्याने त्यांची सदर प्रशिक्षणाकरिता निवड करण्यात आली नव्हती. त्यानंतर दि.२९/१०/१९८४ च्या आदेशान्वये श्री. डोंगरे यांची सेवा नियमित केल्यानंतर त्यांची दि.८/४/१९८५ ते दिनांक ८/५/१९८५ या कालावधीत आयोजित करण्यात आलेल्या सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षणास निवड करण्यात आली व त्या अनुषंगाने जुलै,१९८५ मध्ये झालेल्या परीक्षेत ते प्रथम संधीत उत्तीर्ण झाले.

४. कनिष्ठ लिपिक कर्मचाऱ्याना वरिष्ठ लिपिक/टिप्पणी सहायक पदावर पदोन्नती करिता दिनांक २५/०६/१९८५ रोजी निवड यादी तयार करण्यांत आली होती. सदर निवड यादीमध्ये श्री. एस.पी. ढमढेरे हे कर्मचारी सेवाप्रवेशोत्तर परीक्षा उत्तीर्ण असल्याने त्यांचा समावेश पदोन्नतीच्या यादीत करण्यात आला होता. परंतू, श्री.डोंगरे हे पदोन्नतीची यादी तयार करतांना सेवाप्रवेशोत्तर परीक्षा उत्तीर्ण नसल्याने त्यांचा समावेश पदोन्नतीच्या यादीत करण्यात आला नाही, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे यांच्या दि.०७/१०/१९८५ रोजीच्या आदेशान्वये श्री. ढमढेरे यांना वरिष्ठ लिपिक/टिप्पणी सहायक पदावर पदोन्नती देण्यात आली. तसेच सेवाप्रवेशोत्तर परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर श्री. डोंगरे यांचा दिनांक १०/१२/१९८५ रोजी झालेल्या निवड समितीच्या बैठकीमध्ये वरिष्ठ लिपिक/टिप्पणी सहायक पदावरील पदोन्नतीकरिता विचार करण्यात आला व प्रादेशिक कार्यालयाच्या दिनांक ११/१२/१९८५ रोजीच्या आदेशान्वये श्री. डोगरे यांना वरिष्ठ लिपिक/टिप्पणी सहायक पदावर पदोन्नती देण्यात आली व ते दिनांक ३१/१२/१९८५ रोजी टिप्पणी सहायक पदावर रुजू झाले.

५. श्री. डोंगरे यांची सेवा दिनांक ०६/०७/१९७८ या मूळ दिनांकापासून नियमित करण्यात आली असल्याने ते श्री. ढमढेरे यांना कनिष्ठ लिपिक संवर्गात ज्येष्ठ ठरतात, त्यामुळे श्री. डोंगरे यांना वरीष्ठ लिपीक पदासाठी संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयामधील परिशिष्ट अ मधील अ.क्र.३ अन्वये श्री. ढमढेरे यांच्या वरीष्ठ लिपीक पदाच्या पदोन्नतीचा दिनांक ३१/१०/१९८५ हा मानीव दिनांक अनुज्ञेय ठरतो.

६. श्री. डोंगरे यांना वरीष्ठ लिपीक पदासाठी दि. ३१/१०/१९८५ हा मानीव दिनांक अनुज्ञेय ठरत असल्याने त्याच्या परिणामस्वरुप टिप्पणी सहायक/ वरिष्ठ लिपीक संवर्गात त्यांना कनिष्ठ असलेल्या व प्रमुख लिपीक पदावर पदोन्नती झालेल्या कर्मचाऱ्याचा पदोन्नतीचा मानीव दिनांक अनुज्ञेय ठरणार आहे. व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे यांच्या दि. १०/०४/२००४ रोजीच्या टिप्पणी सहायक/वरिष्ठ लिपीक संवर्गाच्या सेवाज्येष्ठता यादीनुसार श्री. डी. डी. पाटील यांना दि. ०१/०९/२००३ च्या शासन निर्णयान्वये दि. ३१/१०/१९८५ हा मानीव दिनांक मिळाल्याने श्री. पाटील हे (से.ज्ये. क्र. ३१) श्री. डोंगरे यांना ज्येष्ठ ठरत होते. श्री. पाटील यांना दि. १०/०५/२००५ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये प्रमुख लिपीक पदावर पदोन्नती देण्यात आली होती व ते दि. १४/०५/२००५ रोजी प्रमुख लिपीक पदावर रुजू झाले. तथापि, परिच्छेद क्र. ५ मध्ये नमूद केल्यानुसार श्री. डोंगरे यांना वरिष्ठ लिपीक पदावरील पदोन्नतीचा दिनांक ३१/१०/१९८५ हा मानीव दिनांक म्हणून अनुज्ञेय होत असून ते श्री. डी.डी. पाटील यांना वरिष्ठ होत आहेत. त्यामुळे श्री. डोंगरे यांना प्रमुख लिपीक पदासाठी श्री. डी.डी. पाटील यांच्या प्रमुख लिपीक पदावरील पदोन्नतीचा दि. १४/०५/२००५ हा मानीव दिनांक अनुज्ञेय ठरतो.

७. श्री. जयंत गणेश डोंगरे, सेवानिवृत्त लेखा परिक्षक, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय, सातारा यांना वरीष्ठ लिपीक पदासाठी श्री. ढमढेरे यांच्या वरीष्ठ लिपीक पदावरील पदोन्नतीचा दि. ३१/१०/१९८५ हा मानीव दिनांक व त्या अनुषंगाने प्रमुख लिपीक पदासाठी श्री. डी. डी. पाटील यांच्या प्रमुख लिपीक पदाच्या पदोन्नतीचा दि. १०/०५/२००५ हा मानीव दिनांक देण्यास या शासन आदेशान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

८. श्री. जयंत गणेश डोंगरे, सेवानिवृत्त लेखा परिक्षक, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय, सातारा यांना वरीष्ठ लिपीक पदावरील दि. ३१/१०/१९८५ व त्या अनुषंगाने प्रमुख लिपीक पदावरील दि. १०/०५/२००५ हा मानीव दिनांक सेवाज्येष्ठता व वेतननिश्चितीसाठी ग्राह्य धरण्यात यावा. तसेच श्री. डोंगरे यांची वरीष्ठ लिपीक पदावरील व प्रमुख लिपीक पदावरील मानीव दिनांक

अनुक्रमे दि. ३१/१०/१९८५ व दि. १४/०५/२००५ पासून काल्पनिक वेतननिश्चिती करुन, त्याचा प्रत्यक्ष लाभ त्यांना सदर पदावरील प्रत्यक्ष पदोन्नतीच्या दिनांकापासून अनुज्ञेय राहील.

९. सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार तसेच सचिव (कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता ) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०४३०१४३७५२५३०३ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT,
2.5.4.20=12a2d958f75709e9720b38b5349dae16ef85e08a91e69f77d8b94222ab9dc13c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2024.04.30 14:51:09 +05'30'

**( प्रदीप सा. शिवतरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई)
२) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर, ( लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता )
४) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे
५) श्री.जयंत गणेश डोंगरे, सेवानिवृत्त लेखा परिक्षक, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय, सातारा. (संचालनालयामार्फत)
६) निवडनस्ती (व्यशि-१).